**पालघर येथील निवडणूक कार्यालयासाठी खाजगी जागा भाडेतत्वावर घेण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र. ३४९/१६/३३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ जानेवारी, २०१७

**संदर्भ :** १) महसूल व वन विभाग अधिसूचना क्र. प्रोफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि. १७.०६.२०१४.
२) सामान्य प्रशासन विभाग शा.नि.क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.९८८/१४/३३ दि. १४.८.२०१४
३) जि.नि.अ. पालघर यांचे पत्र क्र.निवडणूक/का.वि.१३६/२०१५/दि.१३.८.२०१५

**प्रस्तावना :**

महसूल व वन विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील अधिसूचनेद्वारे ठाणे जिल्हयाचे विभाजन होऊन दि. १.०८.२०१४ पासून पालघर जिल्हयाची निर्मिती करण्यात आली. सदर जिल्हयामध्ये १२८-डहाणू (अ.ज.), १२९-विक्रमगड (अ.जा.), १३०-पालघर (अ.ज.), १३१-बोईसर (अ.ज.), १३२-नालासोपारा व १३४- वसई या मतदार संघाचा अंतर्भाव आहे. त्या जिल्हयातील निवडणूक शाखेकरिता संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयान्वये ५ अस्थायी पदांची निर्मिती करण्यात आली आहे. जिल्हाधिकारी, पालघर यांच्या कार्यालयाची स्थापना दि. १.८.२०१४ रोजी झाल्यावर सदर कार्यालय मुख्य प्रशासकीय इमारत, नविन विक्रीकर कार्यालय, नवली, ता. पालघर या इमारतीच्या पहिल्या मजल्यावर स्थापन करुन सुरु करण्यात आले. मात्र सदर जागा जिल्हाधिकारी कार्यालयांतर्गत विविध उप विभागांना अपुरी पडत असल्याने कामकाजास अडचणी निर्माण होत असल्याचे निदर्शनास आल्यामुळे "पार्श्वनाथ-९" या एका खाजगी इमारतीत संपूर्ण जिल्हाधिकारी कार्यालय स्थापित करण्याबाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, पालघर यांनी विचारात घेऊन दि.१.८.२०१५ पासून सदर इमारतीचा ताबा घेतला आहे. त्याअनुषंगाने सदर इमारतीतील निवडणूक शाखेकरिता २०० चौमी. इतकी जागा दि. १.८.२०१५ पासून भाडयाने घेण्यात आली आहे. सदरहू जागेसाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पालघर त्यांनी रु. २१२/- चौ.मी. हा दर प्रमाणित केला आहे. त्यानुसार सदरहू दरमहा रु. ४२,२००/- इतके भाडे होणार आहे. सदरहू जागा भाडयाने घेण्यास व त्याचे भाडे अदा करण्यास मंजूरी देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :

जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांना निवडणूक शाखेसाठी आवश्यक एकूण २०० चौ.मी. इतकी जागा पार्श्वनाथ ९ कमर्शियल कॉम्प्लेक्स येथे दि. १.८.२०१५ पासून रु.२१२/- चौ.मी. या दराने भाडयाने घेण्यास तसेच त्यानुसार रु. ४२,२००/-(रुपये बेचाळीस हजार दोनशे फक्त) इतके भाडे दरमहा अदा करण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. "ए-२, २०१७, निवडणूका, १०२ निवडणूक अधिकारी, (००)(०१), निवडणूक अधिकारी,१३ कार्यालयीन खर्च, संगणक सांकेतांक, २०१७००१२" या लेखाशिर्षाखालील त्या त्या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७४४/१६/व्यय-४ दि.९.११.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन तसेच वित्तीय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ व शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/विनियम-भाग-२ दि. १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग एक अ.क्र.१० समोरील नियम क्र. ११५ अन्वये प्रशासकीय विभागास कार्यालयीन जागा भाडयाने घेण्यास व भाडे प्रदान करण्यास मंजूरी देण्यास प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकाराचा वापर करुन प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०११३१६५९४२०४०७ असा आहे. सदर शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Nansing Valvi

Digitally signed by Anil Nansing Valvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a7c28200f6d58206324d8086ffcf99758c115aada508a7437f2ae5d9fa1ba5d, cn=Anil Nansing Valvi
Date: 2017.01.16 12:32:42 +05'30'

**( अ. ना. वळवी )**
उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी
महाराष्ट्र राज्य

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई
३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई
४) जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, पालघर
५) उप जिल्हा निवडणूक अधिकारी, पालघर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर
७) अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई-४०००३२
८) निवड नस्ती.